**मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांना सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात माहे जून, २०१० ते मार्च २०११करिता योजनेतर अनुदान मंजूर/वितरित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**शासन निर्णय क्रमांक - मकृवि.२०१०/प्र.क्र. ५६/८-अे**
**दिनांक :- २३ जून,२०१०.**

**संदर्भ :-** १) कृषि व पदम विभाग शासन निर्णय कृषिवि-१७९९/प्र.क्र.१७४/२०-अे, दि.१८.१२.२०००
२)कृषि व पदम विभाग शासन निर्णय -लेखानु-२०१०/प्र.क्र.४९/१०/२-अे, दि. ०६ एप्रील,२०१०
३)शासन निर्णय क्रमांक - मकृवि.२०१०/प्र.क्र. ५६/८-अे दि२८ एप्रील २०१०
४) शासन निर्णय क्रमांक-अंदाज /कशफ़्ला २०१०/(प्र.क्र.५९/१०)/२-अे, दि.२१ मे२०१०

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शासन निर्णय दि. १८/१२/२००० अन्वये सन २०००-०१ च्या आर्थिक वर्षापासून राज्यातील कृषि विद्यापीठांना योजनेतर अनुदान मंजूर करण्यासाठी सुधारित सहाय्यक अनुदान सुत्र विहित केले आहे.

त्यानुसार शासन मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांना **सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात जून, २०१० ते मार्च २०११ करीता "२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण"** या मुख्य लेखाशिर्षाखाली **"०१ पीक संवर्धन"** (योजनेत्तर) करीता एकूण **रु. ७३,८८,०२,०००/-** (अक्षरी रुपये त्र्याहत्तर कोटी अठ्ठ्याएशी लाख दोन हजार फक्त)इतके अनुदान आणि **"०३ पशु संवर्धन"** (योजनेत्तर) या उपमुख्यलेखाशिर्षांतर्गत एकूण **रु ९३,१६,०००/-** (अक्षरी रुपये त्र्यान्नव लाख सोळा हजार फक्त)इतके योजनेत्तर अनुदान खालील बाबनिहाय तपशिलानुसार नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन अनुदान मंजूर करीत आहे. उपरोक्त मंजूर केलेल्या अनुदानाची उपशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय आणि बाबनिहाय विभागणी सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केली आहे.

**(रू. हजारात)**

| अ. क्र | उपलेखाशिर्ष/बाब | सन २०१०-२०११ करिता मुळ मंजुर अनुदान | लेखानुदानानुसार वितरीत अनुदान | जुन २०१० ते मार्च २०११ करीता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| **अ** | **०१ पीकसंवर्धन (२४१५ ००५२)** | | | |
| १ | ०४ निवृत्तीवेतन<br>अ- १ ते ६ गट | १८८५०५ | ३७७०० | १५०८०५ |
| २ | ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) | | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २.१ | आकस्मिक खर्च<br>अ- १ ते ६ गट | ४४८६१ | ८६९९ | ३६१६२ |
| २.२ | इमारत परिरक्षण | २३९७६ | ४६४९ | १९३२७ |
| २.३ | विद्यार्थीनी शैक्षणिक / वसतीगृह शुल्क परतावा | २५७४ | ५०२ | २०७२ |
| | एकूण (३१) | ७१४११ | १३८५० | ५७५६१ |
| ३ | ३५ सहाय्यक अनुदान (वेतन)<br>अ- गट १ ते ६ | ६५८४३६ | १२८००० | ५३०४३६ |
| | ब- प्रक्षेत्र गट | ०० | ०० | ०० |
| | एकूण - ३५ | ६५८४३६ | १२८००० | ५३०४३६ |
| | **एकूण - (०४+३१+३५)** | **९१८३५२** | **१७९५५०** | **७३८८०२** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **ब** | "०३ पशु संवर्धन"<br>**(२४१५०२०३)** | | | |
| १ | ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)<br>अ-आकस्मिक खर्च | ७६० | १४७ | ६१३ |
| २ | ३५ सहाय्यक अनुदान (वेतन) | १०६०३ | १९०० | ८७०३ |
| | **एकूण (३१+३५)** | **११३६३** | **२०४७** | **९३१६** |

**अटी व शर्ती**

१) उपरोक्त मंजूर केलेल्या अनुदानाचा तपशील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केला आहे. विदयापीठाने उपलेखाशिर्ष /गट /योजना आणि बाब निहाय वितरीत केलेला निधी संबंधित योजनेतील जी पदे /बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखादया योजनेखाली अनुदान अखर्चित राहिल्यास, सदर अनूदान पुढील तिमाहीसाठी वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे.

२) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहिला /राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी /योजनांसाठी /बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) उपलेखाशिर्षनिहाय मंजूर योजनांचे व त्या अंतर्गत मंजूर असलेल्या पदांचे सुधारित आकृतिबंधानुसार व्यवस्थितरित्या गटनिहाय वर्गीकरण केले आहे किंवा कसे याची कृषि परिषदेने / विद्यापीठाने सखोल तपासणी करावी. सदर वर्गीकरणामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय कोणतेही बदल करु नयेत.

४) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अनुदान आणि महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहाय्यक अनुदान आणि महसूली उत्पन्न दूस-या गटातील योजनां/ बाबींसाठी वर्ग करु नये. एखादया गटातील योजनेसाठी जास्त सहाय्यक अनुदान वितरीत

झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढया कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

५) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विदयापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यासाठीच विहीत अनुदान देय राहील.

६) प्रत्येक उपलेखाशिर्ष / गट /योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

७) ज्या योजनांतर्गत/योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनेतर / योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेवू नयेत.

८) महाराष्ट्र कृषि, शिक्षण व संशोधन परिषदेने विदयापीठास मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यांत येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांचे कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किंती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

९) शासनाने विदयापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास /भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलबध केली असतील, त्या मुळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

१०) कृषि विदयापीठास त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. या बाबत विदयापीठाने विहित आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

११) विदयापीठास मंजूर करण्यांत आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विदयापीठ अधिनियम १९८३ , महाराष्ट्र कृषि विदयापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विदयापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि **प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तिय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यांत यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये**.

१२) सन २०१०-११ मध्ये पुढील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजना निहाय वितरीत केलेले अनुदान , प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिलकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढयाच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१३) नियमबाहय योजना, पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

१४) विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. उप विभागीय कृषि अधिकारी, परभणी यांनी वरीलप्रमाणे जून-२०१० ते मार्च-२०११ करिता "०१- पीक संवर्धन" ( योजनेतर ) अंतर्गत मंजूर करण्यात आलेले रु. ७३,८८,०२,०००/- (अक्षरी रुपये त्र्याहत्तर कोटी अठ्ठ्याएशी लाख दोन हजार फक्त) आणि "०३, पशु संवर्धन (योजनेतर) अंतर्गत मंजूर करण्यांत आलेल्या रु ९३,१६,००० (अक्षरी रुपये त्र्यान्नव लाख सोळा हजार फक्त) इतके अनुदान शासन निर्णय कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयू-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर,१९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि-२००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५-४-२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे नियंत्रक, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

४. याबाबत वित्त विभागाचे शासन निर्णय क्रमांक - संकीर्ण १००६ /प्र.क्र.१३१/कोषा प्रशासन - ५, दि.१५ मे २००७ तसेच कृषि व पदुम विभागाचे शासन निर्णय क्रमांक- अंदाज १००७/प्र.क्र.६६/२ अे, दि. १ जून, २००७ मधील आदेशाचे पालन करावे.

५. या प्रित्यर्थचा खर्च सन २०१०-२०११ च्या अंदाजपन्नकात खालील उपशीर्षाखली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी वितरण विवरणपन्नाच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा

| **मंजूर अनुदान** | **लेखाशिर्ष** |
|---|---|
| **रुपये ७३,८८,०२,०००/-** | **मागणी कमांक डी ३**<br>२४१५,कृषि विषयक संशोधन व शिक्षण<br>**०१, पीक संवर्धन**<br>१२०, इतर संस्थांना सहाय्य<br>(००)(०० )(०४) **मराठवाडा कृषि विद्यापीठाला**<br>सहाय्यक अनुदान<br>०४, निवृत्ती वेतन विषयक खर्च<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर )<br>३५ , सहायक अनुदान (वेतन)दत्तमत (२४१५ ००५२) |
| **रुपये ९३,१६,०००/-** | **मागणी कमांक डी ३**<br>२४१५,कृषि विषयक संशोधन व शिक्षण<br>**०३, पशु संवर्धन**<br>१२०, इतर संस्थांना सहाय्य<br>(००)(०० )(०४) **मराठवाडा कृषि विद्यापीठाला**<br>सहाय्यक अनुदान<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर )<br>३५, सहायक अनुदान (वेतन) (२४१५०२०३) |

५.	हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १६२ (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या आदेशानुसार व वित्त विभागाने मान्य केलेल्या अर्थसंकल्पीय अंदाज २०१०-२०११ अनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाइटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक २०१००६२२१४०९२७००१ आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( जी. के. राऊत )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

प्रति,

सदस्य सचिव,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, सर्व्हे नं.१३२/ब, भोसलेनगर कै.विष्णूपंत कुशाबा भोसले पथ, पुणे-७ (३ प्रती)
कुलगुरु, **मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी**
कुलसचिव, **मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी**
नियंत्रक **मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी**,(५ प्रती)
कृषि आयुक्त, (अेजी १० सेल ) महाराष्ट्र राज्य,पुणे (खर्च ताळमेळ शाखा ) (५ प्रती)
मत्स्य व्यवसाय आयुक्त, तारापोरवाला मत्स्यालय,मुंबई महाराष्ट्र राज्य,
उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी (३ प्रती)
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर (३ प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,(३ प्रती)
निवासी लेखाअधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी (३ प्रती)
उपकोषागार अधिकारी,परभणी,
मुख्य लेखा परिक्षक ,स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई (३ प्रती)
उपमुख्य लेखा परिक्षक (वरीष्ठ),स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई (३ प्रती)
जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा **मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी**(३ प्रती)
वित्त विभाग (व्यय १/बियुडी १३)
कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक २ अे/६ अे/७ अे,कृषि व पदुम विभाग, मुंबई ४०० ०३२
निवडनस्ती